201009081445480001

नवि-३२
अ.५
६९९०





# महाराष्ट्र शासन राजपत्र
# असाधारण भाग चार

वर्ष २, अंक २३] गुरुवार, ऑगस्ट २६, २०१०/भाद्र ४, शके १९३२ [पृष्ठे १०, किंमत : रुपये २६.००

**असाधारण क्रमांक ३६**

**प्राधिकृत प्रकाशन**

**महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम.**


**अनुक्रमणिका**



## नगरविकास विभाग

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २६ ऑगस्ट २०१०.

**MAHARASHTRA ORDINANCE No. X OF 2010.**

AN ORDINANCE

FURTHER TO AMEND THE MUMBAI MUNICIPAL CORPORATION ACT, THE BOMBAY PROVINCIAL MUNICIPAL CORPORATIONS ACT, 1949, THE CITY OF NAGPUR CORPORATION ACT, 1948 AND THE MAHARASHTRA MUNICIPAL COUNCILS, *NAGAR PANCHAYATS* AND INDUSTRIAL TOWNSHIPS ACT, 1965.

**सन २०१० चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक १०.**

**मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ आणि महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांमध्ये आणखी सुधारणा करण्याकरिता अध्यादेश.**

**ज्याअर्थी,** राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नाही ;

**आणि ज्याअर्थी,** यात यापुढे दिलेल्या प्रयोजनांकरिता, महाराष्ट्राच्या राज्यपालांनी, मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ आणि महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांमध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी तात्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली आहे ; १८८८ चा मुंबई ३. १९४९ चा मुंबई ५९. १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड २. १९६५ चा महा. ४०.

**त्याअर्थी, आता,** भारताच्या संविधानाच्या अनुच्छेद २१३ च्या खंड (१) द्वारे प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करून, महाराष्ट्राचे राज्यपाल, याद्वारे, पुढील अध्यादेश प्रख्यापित करीत आहेत :–

## प्रकरण एक

### प्रारंभिक

संक्षिप्त नाव व प्रारंभ. १. (१) या अध्यादेशास, महाराष्ट्र महानगरपालिका आणि नगरपरिषदा (सुधारणा) अध्यादेश, २०१० असे म्हणावे.

(२) तो, तात्काळ अंमलात येईल.

## प्रकरण दोन

### मुंबई महानगरपालिका अधिनियम याची सुधारणा.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १२८ ची सुधारणा. २. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या (यात यापुढे, या प्रकरणात, ज्याचा निर्देश " मुंबई महानगरपालिका अधिनियम " असा करण्यात आला आहे) कलम १२८ मध्ये,– १८८८ चा मुंबई ३.

(१) पोट-कलम (१) मधील, खंड (अ) मध्ये,–

(क) " सरकारी वर्षात निर्धारित करील, आणि " या मजकुराऐवजी " सरकारी वर्षात निर्धारित करील : " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) पुढील परंतुक जादा दाखल करण्यात येईल :–

" परंतु, महानगरपालिकेस, इमारतीच्या किंवा जमिनीच्या अथवा तिच्या भागाच्या वापरकर्त्यांच्या निरनिराळ्या प्रवर्गांकरिता मालमत्ता कराचे निरनिराळे दर निर्धारित करता येतील ; आणि " ;

(२) पोट-कलम (२) नंतर, पुढील पोट-कलम जादा दाखल करण्यात येईल :—

" (३) पोट-कलमे (१) आणि (२) यामध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, महानगरपालिकेस, कोणत्याही वेळी, महाराष्ट्र महानगरपालिका आणि नगरपरिषदा (सुधारणा) अध्यादेश, २०१० याच्या प्रारंभानंतर, मात्र सरकारी वर्ष २०१०-२०११ (यापुढे, या अधिनियमात, ज्याचा निर्देश " वर्ष २०१०-२०११ " असा करण्यात आला आहे), याच्या समाप्तीपूर्वी, इमारतीच्या किंवा जमिनीच्या अथवा तिच्या भागाच्या वापरकर्त्यांच्या निरनिराळ्या प्रवर्गांकरिता वर्ष २०१०-२०११ मध्ये बसविण्यात येतील असे मालमत्ता कराचे निरनिराळे दर निर्धारित करता २०१० चा महा. अध्या. १०.

येतील. मालमत्ता कराचे असे निर्धारित केलेले दर दिनांक १ एप्रिल २०१० पासून अंमलात येतील आणि तेव्हापासून ते अंमलात आले असल्याचे मानण्यात येईल आणि वर्ष २०१०-२०११ या कालावधीतील कर त्याच दरांनी बसविण्यात येतील व देय असतील. ".

३. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १४०अ ला त्याचा पोट-कलम (१) असा नवीन क्रमांक देण्यात येईल ; आणि अशाप्रकारे नव्याने क्रमांक देण्यात आलेल्या पोट-कलम (१) नंतर, पुढील पोट-कलमे समाविष्ट करण्यात येतील :— सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १४०अ ची सुधारणा.

"(२) कलम १३९अ च्या पोट-कलम (४) मध्ये किंवा या अधिनियमाच्या अन्य कोणत्याही तरतुदींमध्ये किंवा महानगरपालिकेने इमारतींवर व जमिनींवर त्यांच्या भांडवली मूल्याच्या आधारे, मालमत्ता कर बसविण्याच्या पद्धतीचा स्वीकार करण्यासाठी संमत केलेला ठराव, कोणताही असल्यास, त्यामध्ये, काहीही अंतर्भूत असले तरी तात्पुरत्या स्वरूपात, मात्र कलम १५४अ च्या तरतुदींना अधीन राहून, महाराष्ट्र महानगरपालिका आणि नगरपरिषदा (सुधारणा) अध्यादेश, २०१० अंमलात येण्याच्या दिनांकास भांडवली मूल्य निश्चित करण्याची प्रक्रिया चालू असलेल्या इमारती व जमिनी यांच्या संबंधात आणि त्यांचे भांडवली मूल्य निश्चित होईपर्यंत, अशा इमारती व जमिनी यांच्या संबंधात, बसविण्यायोग्य व देय असलेला कर हा, मागील वर्षामध्ये, म्हणजेच ३१ मार्च २०१० रोजी संपणाऱ्या वर्षाकरिता बसविण्यायोग्य व देय असलेल्या कराच्या रकमेइतका असेल ; आणि वर्ष २०१०-२०११ या कालावधीत अशा इमारती व जमिनी यांचे भांडवली मूल्य निश्चित झाल्यावर, वर्ष २०१०-२०११ या कालावधीत बसविण्यायोग्य व देय असलेल्या एकूण कराकरिता अंतिम निर्धारणावर आधारित एक अंतिम बिल बजावण्यात येईल. अशा अंतिम निर्धारणानंतर, निर्धारितीने अधिक रक्कम भरली आहे असे आढळून आले तर, कलम १७९ मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, अशी अधिक रक्कम, अंतिम बिल बजावल्याच्या दिनांकापासून तीन महिन्यांच्या आत, आणि कलम २१७ चे पोट-कलम (५) याच्या पहिल्या परंतुकामध्ये तरतूद केल्याप्रमाणे अशा दिनांकापासून व्याजासह, परत करण्यात येईल किंवा निर्धारितीची संमती मिळवून, मालमत्ता कराची देय रक्कम, कोणतीही असल्यास, त्याचे प्रदान म्हणून किंवा पुढील वर्षाच्या मालमत्ता कराची रक्कम म्हणून, ती रक्कम, समायोजित करण्यात येईल ; आणि अंतिम निर्धारणावरील कराची रक्कम ही निर्धारितीने यापूर्वीच भरलेल्या कराच्या रकमेपेक्षा अधिक असेल तर, यांतील फरकाची रक्कम निर्धारितीकडून वसूल करण्यात येईल.

२०१० चा महा. अध्या. १०.

(३) कलम १६३ किंवा २१७ किंवा या अधिनियमाच्या अन्य कोणत्याही तरतुदींमध्ये काहीही अंतर्भूत असले तरी ; आणि पोट-कलम (२) च्या तरतुदींनुसार बजावण्यात आलेले मालमत्ता कराचे बिल हे अंतिम बिल नसेल ही वस्तुस्थिती लक्षात घेता, अशा बिलावर कोणत्याही मंचासमोर हरकत घेता येणार नाही ; आणि या बिलाची विषयवस्तू असलेल्या ज्या मालमत्तेच्या संबंधात भांडवली मूल्य निश्चित करण्यात आलेले नाही अशा बिलाविरुद्ध किंवा महानगरपालिकेने निर्धारित केलेल्या मालमत्ता कराच्या दराने बसविण्यायोग्य आणि देय असलेल्या कराची रक्कम ही अद्याप अंतिमत: निश्चित करण्यात आलेली नाही या कारणावरून किंवा अन्य कोणत्याही कारणावरून, कोणतीही तक्रार किंवा अपील दाखल करता येणार नाही.".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १४४अ ची सुधारणा.

४. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १४४अ मध्ये पुढील स्पष्टीकरण जादा दाखल करण्यात येईल :—

" **स्पष्टीकरण.**— या कलमाच्या प्रयोजनार्थ, " पारिस्थितीकीय लाभदायक योजना " यात, पावसाचे पाणी साठविण्याची यंत्रणा, मिश्र खत, सौरऊर्जेचा वापर आणि इतर ऊर्जेची अपारंपारिक साधने, सांडपाण्याचे पुनर्चक्रण व पुनर्वापर किंवा पर्यावरणानुकूल आणि पारिस्थितीकीय लाभदायक इमारत बांधकामास चालना देणारी कोणतीही योजना किंवा महानगरपालिकेने किंवा राज्य शासनाने निश्चित केलेली यासारखी योजना, यांचा समावेश होतो. ".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १५४ ची सुधारणा.

५. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५४ मधील,—

(१) पोट-कलम (१अ) मध्ये,—

(क) " मुंबई मुद्रांक अधिनियम, १९५८ च्या तरतुदींन्वये, तयार केलेले मुंबई मुद्रांक (संपत्तीचे वास्तविक बाजार मूल्य ठरवणे) नियम, १९९५ अन्वये, तयार केलेल्या व त्या त्यावेळी अंमलात असलेल्या मुद्रांक शुल्क सिद्ध गणकामध्ये दर्शवलेले कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे मूल्य " या मजकुरानंतर, " आधारभूत मूल्य म्हणून " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ; (१९५८ चा मुंबई ६०.)

(ख) " अशा इमारतीचे किंवा जमिनीचे बाजार मूल्य आधारभूत मूल्य म्हणून, विचारात घेऊन, तसेच पुढील घटकदेखील विचारात घेऊन तिचे भांडवली मूल्य निश्चित करता येईल :— " या मजकुराऐवजी, " अशा इमारतीचे किंवा जमिनीचे बाजार मूल्य आधारभूत मूल्य म्हणून विचारात घेऊन तिचे भांडवली मूल्य निश्चित करता येईल. आयुक्त, उपरोक्तप्रमाणे, भांडवली मूल्य निश्चित करताना, पुढील घटकदेखील विचारात घेईल :— " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) पोट-कलम (१ब) मध्ये, " अशा विविध प्रवर्गांना द्यावयाच्या " या मजकुराऐवजी, " अशा विविध घटकांना व प्रवर्गांना नेमून द्यावयाच्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये कलम १५४अ समाविष्ट करणे.

६. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५४ नंतर पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

विवक्षित प्रकरणांत भांडवली मूल्याची तात्पुरती निश्चिती.

" **१५४अ.** कलम १५४ मध्ये काहीही अंतर्भूत असले तरी, महाराष्ट्र महानगरपालिका आणि नगरपरिषदा (सुधारणा) अध्यादेश, २०१० अंमलात येण्याच्या दिनांकास ज्या ठिकाणी कोणतीही इमारत किंवा जमीन किंवा तिचा काही भाग यांच्या बाबतीत वर्ष २०१०-२०११ या करिता भांडवली मूल्य निश्चित करण्याची प्रक्रिया चालू आहे त्या ठिकाणी वर्ष २०१०-२०११ च्या (२०१० चा महा. अध्या. १०.)

मागील वर्षी अशा इमारतीचे किंवा जमिनीचे किंवा तिच्या काही भागाचे पट्टीयोग्य मूल्य हे तात्पुरते भांडवली मूल्य असेल आणि त्यांचे अंतिम भांडवली मूल्य निश्चित होईपर्यंत, ते या अधिनियमाच्या तरतुदींन्वये वैधरीतीने व कायदेशीरपणे निश्चित केलेले, भांडवली मूल्य असल्याचे मानण्यात येईल; आणि या अधिनियमाच्या तरतुदींन्वये ठेवलेल्या निर्धारण पुस्तकाच्या प्रयोजनार्थ आयुक्ताने, पट्टीयोग्य मूल्य हे तात्पुरते भांडवली मूल्य आहे असे समजणे विधिसंमत असेल; आणि कलम १४०अ च्या, पोट-कलम (२) अन्वये बजावण्यात आलेले मालमत्ता कराचे बिल हे या अधिनियमाच्या तरतुदींन्वये वैधरीतीने व कायदेशीरपणे बजावण्यात आले असल्याचे मानण्यात येईल.".

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १५६ ची सुधारणा.

७. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५६ मध्ये, "नियमांद्वारे त्यास विहित करता येईल" या मजकुराऐवजी "निर्धारित करील" हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ याच्या कलम १६८ ची सुधारणा.

८. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १६८ मध्ये, पोट-कलम (३) मधील, "चार वर्षातून" या मजकुराऐवजी "पाच वर्षातून" हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १८८८ चा मुंबई अधिनियम क्रमांक ३ यामध्ये कलम २१९अ समाविष्ट करणे.

९. मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम २१९ नंतर पुढील कलम समाविष्ट करण्यात येईल :—

विवक्षित तरतुदींचा परिणाम, अधिभावी असणे.

"**२१९अ.** प्रकरण आठ मध्ये किंवा या अधिनियमाच्या अन्य कोणत्याही तरतुदींमध्ये किंवा कोणत्याही न्यायालयाचा न्यायनिर्णय, हुकूमनामा किंवा आदेश यांमध्ये त्यांच्याशी विसंगत काहीही अंतर्भूत असले तरी, महाराष्ट्र महानगरपालिका आणि नगरपरिषदा (सुधारणा) अध्यादेश, २०१० याद्वारे सुधारणा करण्यात आलेली कलमे १२८, १४०अ, १५४अ, १५६ व १६८ ही अधिभावी राहतील.".

२०१० चा महा. अध्या. १०.

प्रकरण तीन

**मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ याची सुधारणा.**

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या कलम १२९ ची सुधारणा.

१०. मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९ (यात यापुढे, या प्रकरणात, ज्याचा निर्देश "प्रांतिक महानगरपालिका अधिनियम" असा करण्यात आला आहे) याच्या कलम १२९ मध्ये,– १९४९ चा मुंबई ५९.

(१) पहिल्या परंतुकानंतर, पुढील परंतुक समाविष्ट करण्यात येईल :–

" परंतु आणखी असे की, महानगरपालिकेस, इमारतींच्या किंवा जमिनीच्या अथवा तिच्या भागाच्या वापरकर्त्यांच्या निरनिराळ्या प्रवर्गांकरिता मालमत्ता कराचे निरनिराळे दर निर्धारित करता येतील. " ;

(२) दुसऱ्या परंतुकामध्ये, " परंतु " या मजकुराऐवजी " परंतु तसेच " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९४९ चा मुंबई अधिनियम क्रमांक ५९ याच्या अनुसूची घ ची सुधारणा.

११. प्रांतिक महानगरपालिका अधिनियमाच्या अनुसूची 'घ' मध्ये प्रकरण आठ मधील,–

(क) नियम ७क मधील,–

(१) पोट-नियम (१) मध्ये,–

(क) " मुंबई मुद्रांक अधिनियम, १९५८ च्या तरतुदींन्वये, तयार केलेले मुंबई मुद्रांक (संपत्तीचे वास्तविक बाजार मूल्य ठरवणे) नियम, १९९५ अन्वये, तयार केलेल्या व त्या त्यावेळी अंमलात असलेल्या मुद्रांक शुल्क सिद्ध गणकामध्ये दर्शविलेले कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे मूल्य " या मजकुरानंतर " आधारभूत मूल्य म्हणून " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ; १९५८ चा मुंबई ६०.

(ख) " अशा इमारतीचे किंवा जमिनीचे बाजार मूल्य आधारभूत मूल्य म्हणून विचारात घेऊन, तसेच पुढील घटक देखील विचारात घेऊन तिचे भांडवली मूल्य निश्चित करता येईल :– " या मजकुराऐवजी " अशा इमारतीचे किंवा जमिनीचे बाजार मूल्य आधारभूत मूल्य म्हणून विचारात घेऊन तिचे भांडवली मूल्य निश्चित करता येईल. आयुक्त, उपरोक्तप्रमाणे, भांडवली मूल्य निश्चित करताना, पुढील घटक देखील विचारात घेईल :– " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) पोट-नियम (२) मध्ये, " अशा विविध प्रवर्गांना नेमून द्यावयाच्या " या मजकुराऐवजी " अशा विविध घटकांना व प्रवर्गांना नेमून द्यावयाच्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(ख) नियम २१ मधील पोट-नियम (२) मध्ये, " चार वर्षांतून " या मजकुराऐवजी " पाच वर्षांतून " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

## प्रकरण चार

## नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ याची सुधारणा.

१९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड २. **१२.** नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ (यात यापुढे, या प्रकरणात, ज्याचा निर्देश " नागपूर महानगरपालिका अधिनियम " असा करण्यात आला आहे) याच्या कलम ११५क मधील पोट-कलम (१) मध्ये, पुढील परंतुक जादा दाखल करण्यात येईल :— सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ११५क ची सुधारणा.

" परंतु, महानगरपालिकेस, इमारतीच्या किंवा जमिनीच्या अथवा तिच्या भागाच्या वापरकर्त्यांच्या निरनिराळ्या प्रवर्गांकरिता मालमत्ता कराचे निरनिराळे दर निर्धारित करता येतील. ".

**१३.** नागपूर महानगरपालिका अधिनियमाच्या कलम ११९ च्या खंड (ख) मध्ये,— सन १९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड अधिनियम क्रमांक २ याच्या कलम ११९ ची सुधारणा.

(१) उप-खंड (क) मध्ये,—

१९५८ चा मुंबई ६०. (क) " मुंबई मुद्रांक अधिनियम, १९५८ च्या तरतुदीअन्वये, तयार केलेले मुंबई मुद्रांक (संपत्तीचे वास्तविक बाजार मूल्य ठरवणे) नियम, १९९५ अन्वये, तयार केलेल्या व त्या त्यावेळी अंमलात असलेल्या मुद्रांक शुल्क सिद्ध गणकामध्ये दर्शवलेले कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे मूल्य " या मजकुरानंतर " आधारभूत मूल्य म्हणून " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

(ख) " अशा इमारतीचे किंवा जमिनीचे बाजार मूल्य आधार मूल्य म्हणून विचारात घेऊन, तसेच पुढील घटक देखील विचारात घेऊन तिचे भांडवली मूल्य निश्चित करता येईल :— " या मजकुराऐवजी, " अशा इमारतीचे किंवा जमिनीचे बाजार मूल्य आधारभूत मूल्य म्हणून विचारात घेऊन तिचे भांडवली मूल्य निश्चित करता येईल. आयुक्त, उपरोक्त-प्रमाणे, भांडवली मूल्य निश्चित करताना, पुढील घटक देखील विचारात घेईल :— " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) उप-खंड (ख) मध्ये, " अशा विविध प्रवर्गांना नेमून द्यावयाच्या " या मजकुराऐवजी, " अशा विविध घटकांना व प्रवर्गांना नेमून द्यावयाच्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

## प्रकरण पाच

## महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ याची सुधारणा.

१९६५ चा महा. ४०. **१४.** महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ (यात यापुढे, या प्रकरणात, ज्याचा निर्देश " नगरपरिषदा अधिनियम " असा करण्यात आला आहे) याच्या कलम १०५ मधील पोट-कलम (१) मध्ये, दुसऱ्या परंतुकानंतर पुढील परंतुक जादा दाखल करण्यात येईल :— सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १०५ ची सुधारणा.

" परंतु तसेच, नगरपरिषदेस, इमारतीच्या किंवा जमिनीच्या अथवा तिच्या भागाच्या वापरकर्त्यांच्या निरनिराळ्या प्रवर्गांकरिता कराचे निरनिराळे दर निर्धारित करता येतील. ".

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम ११४ ची सुधारणा.

१५. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम ११४ च्या पोट-कलम (३) मध्ये,—

(१) खंड (क) मध्ये,—

(क) " मुंबई मुद्रांक अधिनियम, १९५८ याच्या तरतुदींन्वये तयार केलेले मुंबई मुद्रांक (संपत्तीचे वास्तविक बाजार मूल्य ठरवणे) नियम, १९९५ अन्वये, तयार केलेल्या व त्या त्यावेळी अंमलात असलेल्या मुद्रांक शुल्क सिद्धगणकामध्ये दर्शवलेले कोणत्याही इमारतीचे किंवा जमिनीचे मूल्य " या मजकुरानंतर " आधारभूत मूल्य म्हणून " हा मजकूर समाविष्ट करण्यात येईल ;

१९५८ चा मुंबई ६०.

(ख) " अशा इमारतीचे किंवा जमिनीचे बाजार मूल्य आधारभूत मूल्य म्हणून, विचारात घेऊन, तसेच पुढील घटकदेखील विचारात घेऊन तिचे भांडवली मूल्य निश्चित करता येईल :— " या मजकुराऐवजी " अशा इमारतीचे किंवा जमिनीचे बाजार मूल्य आधारभूत मूल्य म्हणून विचारात घेऊन तिचे भांडवली मूल्य निश्चित करता येईल. मुख्य अधिकारी, उपरोक्तप्रमाणे, भांडवली मूल्य निश्चित करताना, पुढील घटकदेखील विचारात घेईल :— " हा मजकूर दाखल करण्यात येईल ;

(२) खंड (ख) मध्ये, " अशा विविध प्रवर्गांना द्यावयाच्या " या मजकुराऐवजी " अशा विविध घटकांना व प्रवर्गांना नेमून द्यावयाच्या " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

सन १९६५ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ४० याच्या कलम १२४ ची सुधारणा.

१६. नगरपरिषदा अधिनियमाच्या कलम १२४ च्या पोट-कलम (२) मध्ये, " चार वर्षांतून " या मजकुराऐवजी " पाच वर्षांतून " हा मजकूर दाखल करण्यात येईल.

## प्रकरण सहा

### संकीर्ण

अडचण दूर करण्याचा अधिकार.

१७. (१) या अध्यादेशात अंतर्भूत असलेल्या बाबींच्या संबंधात मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ किंवा, यथास्थिति, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांच्या तरतुदी अंमलात आणताना, कोणतीही अडचण उद्‌भवल्यास, राज्य शासनास, अडचण दूर करण्याच्या प्रयोजनासाठी, या अध्यादेशाद्वारे सुधारणा करण्यात आलेल्या मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ किंवा, यथास्थिति, महाराष्ट्र नगरपरिषदा, नगर पंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांच्या तरतुदींशी विसंगत नसणारी, त्यास आवश्यक वाटेल अशी कोणतीही गोष्ट, प्रसंग उद्‌भवेल त्यानुसार, राजपत्रात आदेश प्रसिद्ध करून, करता येईल.

१८८८ चा मुंबई ३.
१९४९ चा मुंबई ५९.
१९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड २.
१९६५ चा महा ४०.
१८८८ चा मुंबई ३.
१९४९ चा मुंबई ५९.
१९५० चा मध्यप्रांत व वऱ्हाड २.
१९६५ चा महा ४०.

(२) पोट-कलम (१) अन्वये काढण्यात आलेला प्रत्येक आदेश, तो काढण्यात आल्यानंतर, शक्य तितक्या लवकर राज्य विधानमंडळाच्या प्रत्येक सभागृहासमोर मांडण्यात येईल.

## निवेदन.

मालमत्ता करांमध्ये अधिकाधिक पारदर्शकता आणण्यासाठी आणि मालमत्ता करांपासून स्थानिक नागरी संस्थांना मिळणाऱ्या महसुलात सुसूत्रता आणण्यासाठी, महानगरपालिका आणि नगरपरिषदा यांना राज्यातील महानगरपालिका कायद्यांमध्ये सुधारणा करून, मालमत्तेच्या पट्टीयोग्य मूल्याच्या आधारे बसविण्यात येणाऱ्या मालमत्ता कराच्या पद्धतीऐवजी मालमत्तेच्या भांडवली मूल्यावर आधारित मालमत्ता कर बसविण्याचा अधिकार प्रदान करण्यात आला आहे. त्यानुसार, मुंबई महानगरपालिकेने १ एप्रिल २०१० पासून भांडवली मूल्यावर आधारित मालमत्ता कर आकारण्याचा निर्णय घेतला आहे. प्राप्त परिस्थितीत, अंमलबजावणीच्या दृष्टीने विवक्षित संक्रमणी तरतुदी मुंबई महानगरपालिका अधिनियम (१८८८ चा मुंबई ३) यामध्ये व सर्व महापालिका कायद्यांमध्ये एकरूपता राखण्याच्या दृष्टीने पुढीलप्रमाणे विवक्षित तरतुदी अंतर्भूत करण्याचे प्रस्तावित आहे :—

(१) इमारत किंवा जमीन किंवा तिचा भाग याच्या निरनिराळ्या वापरकर्त्यांकरिता, कराचे निरनिराळे दर निश्चित करणे व त्यानुसार, १ एप्रिल २०१० पासून वर्ष २०१०-२०११ या कालावधीत असे दर निश्चित करणे मुंबई महानगरपालिकेला शक्य व्हावे या दृष्टीने, कलम १२८ मध्ये सुधारणा करण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे. तशीच सुधारणा अन्य महानगरपालिका अधिनियम तसेच नगरपरिषदा अधिनियम यांमध्ये करण्याचे देखील प्रस्तावित करण्यात येत आहे ;

(२) मागील वर्षामध्ये बसविण्यायोग्य व देय असलेल्या कराच्या रकमेइतका तात्पुरता मालमत्ता कर बसविणे मुंबई महानगरपालिकेला शक्य व्हावे या दृष्टीने कलम १४०अ मध्ये सुधारणा करण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे ;

(३) मुद्रांक शुल्क सिद्धगणक किंवा इमारती व जमिनी यांचे बाजारमूल्य यांच्या आधारे मालमत्तेचे भांडवली मूल्य ठरविताना विचारात घ्यावयाचे अन्य घटक स्पष्ट करण्यासाठी मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १५४ मध्ये योग्य सुधारणा करण्याचे प्रस्तावित केले आहे. तशीच सुधारणा अन्य महानगरपालिका अधिनियम तसेच नगरपरिषदा अधिनियम यांमध्ये करण्याचेदेखील प्रस्तावित करण्यात येत आहे ;

(४) मुंबई महानगरपालिका अधिनियमाच्या कलम १४४अ मध्ये वापरण्यात आलेली "पारिस्थितीकीय लाभदायक योजना" ही संज्ञा स्पष्ट करण्यासाठी इतर महानगरपालिका अधिनियम तसेच नगरपरिषदा अधिनियम यांमध्ये केलेल्या तरतुदींच्या धर्तीवर, उक्त कलम १४४अ मध्ये स्पष्टीकरण जादा दाखल करण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे ;

(५) इमारत किंवा जमीन किंवा त्याचा कोणताही भाग यांचे भांडवली मूल्य निश्चित होईपर्यंत, वर्ष २०१०-२०११ च्या मागील वर्षाचे त्यांचे पट्टीयोग्य मूल्य हे, तात्पुरते भांडवली मूल्य म्हणून समजणे मुंबई महानगरपालिकेला शक्य व्हावे या दृष्टीने, म्हण,अे १४०अ अन्वये त्यावर कर बसविता येणे शक्य व्हावे म्हणून, नवीन कलम १५४अ समाविष्ट करण्याचे प्रस्तावित करण्यात येत आहे.

२. राज्य विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांचे अधिवेशन चालू नाही आणि उपरोक्त प्रयोजनांसाठी, महाराष्ट्राच्या राज्यपालांनी, मुंबई महानगरपालिका अधिनियम, मुंबई प्रांतिक महानगरपालिका अधिनियम, १९४९, नागपूर शहर महानगरपालिका अधिनियम, १९४८ आणि महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नगरी अधिनियम, १९६५ यांमध्ये आणखी सुधारणा करण्यासाठी तत्काळ कार्यवाही करणे जीमुळे आवश्यक व्हावे अशी परिस्थिती अस्तित्वात असल्याबद्दल त्यांची खात्री पटली आहे, म्हणून हा अध्यादेश प्रख्यापित करण्यात येत आहे.

मुंबई,
दिनांक २६ ऑगस्ट २०१०.

**के. शंकरनारायणन्,**
महाराष्ट्राचे राज्यपाल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**मनुकुमार श्रीवास्तव,**
शासनाचे सचिव.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.





# महाराष्ट्र शासन राजपत्र

## असाधारण भाग आठ

वर्ष २, अंक ३२ ] गुरुवार, ऑगस्ट २६, २०१०/भाद्र ४, शके १९३२ [ पृष्ठे ९, किंमत : रुपये १९.००

असाधारण क्रमांक ६४


**प्राधिकृत प्रकाशन**

महाराष्ट्र विधानमंडळाचे अधिनियम व राज्यपालांनी प्रख्यापित केलेले अध्यादेश व केलेले विनियम आणि विधी व न्याय विभागाकडून आलेली विधेयके (इंग्रजी अनुवाद).

In pursuance of clause (3) of article 348 of the Constitution of India, the following translation in English of the Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Amendment) Ordinance, 2010 (Mah. Ord. X of 2010), is hereby published under the authority of the Governor.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

H. B. PATEL,
Secretary to Government,
Law and Judiciary Department.

(Translation in English of the Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Amendment) Ordinance, 2010 (Mah. Ord. X of 2010), published under the authority of the Governor.

---

**URBAN DEVELOPMENT DEPARTMENT**

Mantralaya, Mumbai 400 032, dated the 26th August 2010.

**MAHARASHTRA ORDINANCE No. X OF 2010.**

*AN ORDINANCE*

*further to amend the Mumbai Municipal Corporation Act, the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949, the City of Nagpur Corporation Act, 1948 and the Maharashtra Municipal Councils, Nagar Panchayats and Industrial Townships Act, 1965.*

WHEREAS, both Houses of the State Legislature are not in session ;

AND WHEREAS, the Governor of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary for him to take

immediate action further to amend the Mumbai Municipal Corporation Act, the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949, the City of Nagpur Corporation Act, 1948 and the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965, for the purposes hereinafter appearing ;

Bom. III of 1888. Bom. LIX of 1949. C.P. and Berar II of 1950. Mah. XL of 1965.

NOW, THEREFORE, in exercise of the powers conferred by clause (*1*) of article 213 of the Constitution of India, the Governor of Maharashtra is hereby pleased to promulgate the following Ordinance, namely :—

## CHAPTER I

### PRELIMINARY

Short title and commencement.

**1.** (*1*) This Ordinance may be called the Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Amendment) Ordinance, 2010.

(*2*) It shall come into force at once.

## CHAPTER II

### AMENDMENTS TO THE MUMBAI MUNICIPAL CORPORATION ACT

Amendment of section 128 of Bom. III of 1888.

**2.** In section 128 of the Mumbai Municipal Corporation Act (hereinafter, in this Chapter, referred to as " the Mumbai Corporation Act "),— Bom. III of 1888.

(*1*) in sub-section (*1*), in clause (*a*),—

(*a*) for the words " official year ; and " the words " official year : " shall be substituted ;

(*b*) the following proviso shall be added, namely :—

" Provided that, the Corporation may determine different rates of property taxes for different categories of users of a building or land or part thereof ; and " ;

(*2*) after sub-section (2), the following sub-section shall be added, namely :—

"(3) Notwithstanding anything contained in sub-sections (*1*) and (2), the Corporation may at any time, after the commencement of the Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Amendment) Ordinance, 2010, but before the expiry of the official year 2010-2011 (hereinafter, in this Act, referred to as "the year 2010-2011"), determine different rates of property taxes for different categories of users of a building or land or part thereof, which may be levied in the year 2010-2011. The rates of property taxes so determined shall be effective and shall be deemed to have been effective from the 1st April 2010 and the tax during the year 2010-2011 shall be leviable and payable at those rates.". Mah. Ord. X of 2010.

Amendment of section 140A of Bom. III of 1888.

**3.** Section 140A of the Mumbai Corporation Act shall be re-numbered as sub-section (*1*) thereof ; and after sub-section (*1*), as so re-numbered, the following sub-sections shall be inserted, namely :—

" (*2*) Notwithstanding anything contained in sub-section (*4*) of section 139A or any other provisions of this Act or Resolution, if

any, passed by the Corporation adopting the levy of property tax on building and lands on the basis of capital value, but subject to the provisions of section 154A, buildings and lands in respect of which the process of fixing capital value is in progress on the date of coming into force of the Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Amendment) Ordinance, 2010, and pending fixing the capital value thereof, the tax leviable and payable in respect of such buildings and lands shall provisionally be equal to the amount of tax leviable and payable in the preceding year, that is to say, for the year ending on the thirty-first day of March 2010; and on fixation of capital value of such buildings and lands during the year 2010-2011, a final bill based on the final assessment shall be issued for the total tax leviable and payable during the year 2010-2011. After such final assessment, if it is found that the assessee has paid excess amount, such excess amount shall, notwithstanding anything contained in section 179, be refunded within three months from the date of issuing the final bill, along with interest from such date as provided in the first proviso to sub-section (*5*) of section 217, or after obtaining the consent of the assessee shall be adjusted towards payment of property tax due, if any, or for the subsequent year; and if the amount of tax on final assessment is more than the amount of tax already paid by the assessee the difference shall be recovered from the assessee.

Mah. Ord. X of 2010.

(*3*) Notwithstanding anything contained in section 163 or 217 or any other provisions of this Act and having regard to the fact that the property tax bill has been issued in accordance with the provisions of sub-section (2), not being a final bill, such bill shall not be questioned before any forum ; and no complaint or appeal shall lie against such bill merely on the ground that capital value in respect of the property which is the subject matter of the bill is not yet fixed, or that the amount of tax leviable and payable at the rate of the property tax determined by the Corporation is not yet finally ascertained, or on any other ground whatever.".

**4.** To section 144A of the Mumbai Corporation Act, the following *Explanation* shall be added, namely :— Amendment of section 144A of Bom. III of 1888.

"*Explanation*.—For the purposes of this section "ecologically beneficial scheme" includes rain water harvesting system, vermi composting, use of solar energy and other non-conventional sources of energy, recycling and re-use of waste water, or any scheme for promoting environment friendly and ecologically beneficial building construction or the like as the Corporation or the State Government may identify. ".

**5.** In section 154 of the Mumbai Corporation Act,— Amendment of section 154 of Bom. III of 1888.

(*1*) in sub-section (*1A*),—

(*a*) after the words and figures "the Bombay Stamp Act, 1958" the words "as a base value," shall be inserted ; Bom. LX of 1958.

(*b*) for the words " taking into consideration the market value of such building or land, as a base value ; and also have regard to the following factors, namely :— " the words " taking into consideration the market value of such building or land, as a base value. The Commissioner, while fixing the capital value as aforesaid, shall also have regard to the following factors, namely :— " shall be substituted ;

(*2*) in sub-section (*1B*), for the words " assigned to various such categories " the words " assigned to various such factors and categories " shall be substituted.

Insertion of section 154A in Bom. III of 1888.

**6.** After section 154 of the Mumbai Corporation Act, the following section shall be inserted, namely :—

Provisional fixation of capital value in certain cases.

" **154A.** Notwithstanding anything contained in section 154, where in respect of any building or land or part thereof, the process of fixing capital value for the year 2010-2011 is in progress on the date of coming into force of the Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Amendment) Ordinance, 2010, the rateable value of such building or land or any part thereof during the year preceding the year 2010-2011 shall be the provisional capital value and shall be deemed to be the capital value validly and legally fixed under the provisions of this Act, pending fixing the final capital value thereof ; and it shall be lawful for the Commissioner to treat it as such for the purposes of assessment book kept under the provisions of this Act, and the bill of property tax issued under sub-section (*2*) of section 140A shall be deemed to have been validly and legally issued under the provisions of this Act. ".

Mah. Ord. X of 2010.

Amendment of section 156 of Bom. III of 1888.

**7.** In section 156 of the Mumbai Corporation Act, for the words "prescribe by rules" the word "determine" shall be substituted.

Amendment of section 168 of Bom. III of 1888.

**8.** In section 168 of the Mumbai Corpotation Act, in sub-section (*3*), for the words "four years" the words "five years" shall be substituted.

Insertion of section 219A in Bom. III of 1888.

**9.** After section 219 of the Mumbai Corporation Act, the following section shall be inserted, namely :—

Certain provisions to have overriding effect.

" **219A.** The provisions of sections 128, 140A, 154A, 156 and 168, as amended by the Maharashtra Municipal Corporations and Municipal Councils (Amendment) Ordinance, 2010, shall have effect notwithstanding anything inconsistent therewith contained in Chapter VIII or in any other provisions of this Act, or in any judgment, decree or order of any court.".

Mah. Ord. X of 2010.

## CHAPTER III

### AMENDMENTS TO THE BOMBAY PROVINCIAL MUNICIPAL CORPORATIONS ACT, 1949

Bom. LIX of 1949.

**10.** In section 129 of the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949 (hereinafter, in this Chapter, referred to as " the Provincial Corporations Act"),— Amendment of section 129 of Bom. LIX of 1949.

(*1*) after the first proviso, the following proviso shall be inserted, namely :—

"Provided further that, the Corporation may determine different rates of property tax for different categories of user of a building or land or a part thereof :";

(*2*) in the second proviso, for the words "Provided that" the words "Provided also that" shall be substituted.

**11.** In Schedule 'D' of the Provincial Corporations Act, in Chapter VIII,— Amendment of Schedule 'D' to Bom. LIX of 1949.

(*A*) in rule 7A,—

(*1*) in sub-rule (*1*),—

Bom. LX of 1958.

(*a*) after the words and figures "the Bombay Stamp Act, 1958" the words "as a base value," shall be inserted;

(*b*) for the words "taking into consideration the market value of such building or land, as a base value; and also have regard to the following factors, namely:—" the words "taking into consideration the market value of such building or land, as a base value. The Commissioner, while fixing the capital value as aforesaid, shall also have regard to the following factors, namely:—" shall be substituted;

(*2*) in sub-rule (*2*), for the words "assigned to various such categories" the words "assigned to various such factors and categories" shall be substituted;

(*B*) in rule 21, in sub-rule (*2*), for the words "four years" the words "five years" shall be substituted.

## CHAPTER IV

### AMENDMENTS TO THE CITY OF NAGPUR CORPORATION ACT, 1948

C.P. and Berar II of 1950.

**12.** In section 115A of the City of Nagpur Corporation Act, 1948 (hereinafter, in this Chapter, referred to as "the Nagpur Corporation Act"), to sub-section (*1*), the following proviso shall be added, namely:— Amendment of section 115A of C.P. and Berar II of 1950.

"Provided that, the Corporation may determine different rates of property tax for different categories of users of a building or land or a part thereof.".

Amendment of section 119 of C.P. and Berar II of 1950.

**13.** In section 119 of the Nagpur Corporation Act, in clause (B),–

(*1*) in clause (*a*),–

(*a*) after the words and figures "the Bombay Stamp Act, 1958" the words "as a base value," shall be inserted ; Bom. LX of 1958.

(*b*) for the words "taking into consideration the market value of such building or land, as a base value ; and also have regard to the following factors, namely :—" the words "taking into consideration the market value of such building or land, as a base value. The Commissioner, while fixing the capital value as aforesaid, shall also have regard to the following factors, namely :—" shall be substituted ;

(*2*) in clause (*b*), for the words "assigned to various such categories" the words "assigned to various such factors and categories" shall be substituted.

## CHAPTER V

### AMENDMENTS TO THE MAHARASHTRA MUNICIPAL COUNCILS, *NAGAR PANCHAYATS* AND INDUSTRIAL TOWNSHIPS ACT, 1965

Amendment of section 105 of Mah. XL of 1965.

**14.** In section 105 of the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965 (hereinafter, in this Chapter, referred to as "the Municipal Councils Act"), to sub-section (*1*), after the second proviso, the following proviso shall be added, namely :– Mah. XL of 1965.

"Provided also that, the Council may determine different rates of tax for different categories of users of a building or land or a part thereof.".

Amendment of section 114 of Mah. XL of 1965.

**15.** In section 114 of the Municipal Councils Act, in sub-section (*3*),–

(*1*) in clause (*a*),–

(*a*) after the words and figures "the Bombay Stamp Act, 1958" the words "as a base value," shall be inserted ; Bom. LX of 1958.

(*b*) for the words "taking into consideration the market value of such building or land, as a base value ; and also have regard to the following factors, namely :—" the words "taking into consideration the market value of such building or land. as a base value. The Chief Officer, while fixing the capital value as aforesaid, shall also have regard to the following factors, namely :—" shall be substituted ;

(2) in sub-clause (b), for the words "assigned to various such categories" the words "assigned to various such factors and categories" shall be substituted.

**16.** In section 124 of the Municipal Councils Act, in sub-section (2), for the words "four years" the words "five years" shall be substituted. Amendment of section 124 of Mah. XL of 1965.

## CHAPTER VI

### MISCELLANEOUS

Power to remove difficulty.

Bom. III of 1888. Bom. LIX of 1949. C.P. and Berar II of 1950. Mah. XL of 1965.

**17.** (1) If any difficulty arises in giving effect to the provisions of the Mumbai Municipal Corporation Act, the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949, the City of Nagpur Corporation Act, 1948 or, as the case may be, the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965, in respect of the matters contained in this Ordinance, the State Government may, as the occasion arises, by order published in the *Official Gazette*, do anything not inconsistent with the provisions of the Mumbai Municipal Corporation Act, the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949, the City of Nagpur Corporation Act, 1948 or, as the case may be, the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965, as amended by this Ordinance, which appears to it to be necessary for the purpose of removing the difficulty.

Bom. III of 1888. Bom. LIX of 1949. C.P. and Berar II of 1950. Mah. XL of 1965.

(2) Every order made under sub-section (1) shall be laid, as soon as may be, after it is made, before each House of the State Legislature.

## STATEMENT

With a view to bring greater transparency and to rationalize the revenue of the Urban Local Bodies from property taxes, the Municipal Corporations and Municipal Councils have been empowered to levy property tax on the basis of capital value of property in lieu of the system of levy of property tax on the basis of rateable value of property, by amending the Municipal Laws in the State. Accordingly, the Mumbai Municipal Corporation has decided to levy the property tax on the basis of capital value, with effect from the 1st April 2010. Under the prevailing circumstances certain transitory provisions are proposed to be incorporated in the Mumbai Municipal Corporation Act (Bom. III of 1888) from implementation point of view and certain provisions have been proposed to maintain uniformity in all Municipal Laws as under :—

(*1*) to enable the Mumbai Municipal Corporation to fix different rates of tax for different user of a building or land or a part thereof, and accordingly to fix such rates during the year 2010-2011, effective from the 1st April 2010, an amendment to section 128 is proposed. Similar amendment has also been proposed in the other Municipal Corporations Acts as well as the Municipal Councils Act ;

(*2*) to enable the Mumbai Municipal Corporation for provisional levy of property tax equal to the amount of tax leviable and payable in the preceding year, an amendment to section 140A is proposed ;

(*3*) to clarify the provision relating to other factors to be taken into account while deciding the capital value of the property, on the basis of stamp duty ready reckoner or market value of the buildings and lands, suitable amendment to section 154 of the Mumbai Corporation Act is proposed. Similar amendment has also been proposed in other Municipal Corporation Acts as well as Municipal Councils Act ;

(*4*) to explain the term "ecologically beneficial scheme" used in section 144A of the Mumbai Municipal Corporation Act, an explanation is proposed to be added to the said section 144A on the lines of the provisions obtaining in other Municipal Corporation Acts and the Municipal Councils Act ;

(*5*) to enable the Mumbai Municipal Corporation to treat the rateable value of the building or land or any part thereof, pending fixing the capital value thereof, for the year preceding the year 2010-2011 as a provisional capital value so as to levy tax thereon under section 140A, a new section 154A is proposed to be inserted.

2. As both Houses of the State Legislature are not in session and the Governor of Maharashtra is satisfied that circumstances exist which render it necessary for him to take immediate action further to amend the Mumbai Municipal Corporation Act, the Bombay Provincial Municipal Corporations Act, 1949, the City of Nagpur Corporation Act, 1948 and the Maharashtra Municipal Councils, *Nagar Panchayats* and Industrial Townships Act, 1965, for the purposes aforesaid, this Ordinance is promulgated.

Mumbai,
Dated the 26th August 2010.

K. SANKARANARAYANAN,
Governor of Maharashtra.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

MANU KUMAR SHRIVASTAV,
Secretary to Government.

ON BEHALF OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, PRINTED AND PUBLISHED BY SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI, PRINTED AT GOVERNMENT CENTRAL PRESS, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004 AND PUBLISHED AT DIRECTORATE OF GOVERNMENT PRINTING, STATIONERY AND PUBLICATION, 21-A, NETAJI SUBHASH ROAD, CHARNI ROAD, MUMBAI 400 004, EDITOR : SHRI PARSHURAM JAGANNATH GOSAVI.

महाराष्ट्र शासन

अध्यादेश

तात्काळ

क्रमांक:- एमएमसी-२०१०/१९७/प्र.क्र.८८/२०१०/नवि-३२
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक -४ सप्टेंबर, २०१०

प्रति,

(१) सर्व महानगरपालिकांचे महापौर,
(२) प्रधान सचिव, राज्य निवडणूक आयोग,नवीन प्रशासन भवन,मुंबई
(३) सर्व महानगरपालिका आयुक्त,
(४) आयुक्त तथा संचालक नगर परिषद प्रशासन संचालनालय,वरळी,मुंबई,
(५) सर्व विभागीय आयुक्त तथा प्रादेशिक संचालक नगरपरिषद प्रशासन संचालनालय
(६) सर्व जिल्हाधिकारी,
(७) सर्व नगर परिषदा / नगर पंचायती यांचे मुख्याधिकारी,
(८) प्रबंधक,मुंबई उच्च न्यायालयाची सर्व खंडपीठे,(यादीप्रमाणे),
(९) प्रबंधक, सर्व जिल्हा न्यायालये व राज्यातील इतर न्यायालये(यादीप्रमाणे)
(१०)महासंचालक,माहिती व जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई,
(११) संचालक, अखिल भारतीय स्थानिक स्वराज्य संस्था,एम.एन.रॉय कॅम्पस,टी.पी.एस.रोड, वांद्रे (पूर्व ),मुंबई-४०० ०५१.

विषय:- मालमत्ता कर आकारणी करताना मालमत्तेच्या पट्टीयोग्य मूल्याच्या आधारे बसविण्यात येणा-या मालमत्ता कराच्या पध्दतीऐवजी मालमत्तेच्या भांडवली मूल्यावर आधारित मालमत्ता कर आकारणी-- सन २०१०चा महाराष्ट्र अध्यादेश क्र.१०

महोदय ,

मालमत्ता कर आकारण्यासाठी पट्टीयोग्य मूल्यावर आधारीत आकारण्यात येणा-या मालमत्ता कराऐवजी भांडवली मूल्यावर आधारित कर आकारण्याकरीता महानगरपालिका व नगरपरिषदा अधिनियमात सन २००९ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ११ व सन २०१०चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक १० अन्वये तरतूदी करण्यात आल्या आहेत. या तरतूदींच्या अंमलबजावणीच्या दृष्टीने विवक्षित संक्रमणी तरतूदी मुंबई महानगरपालिका अधिनियमात तसेच सर्व महानगरपालिका / नगरपालिका अधिनियमांमध्ये एकरुपता

क्रृ. मा. पृ.

राखण्याच्या दृष्टीने विवक्षित तरतूद असलेला सन २०१०चा महाराष्ट्र अध्यादेश क्रमांक १०, दिनांक २६ ऑगस्ट,२०१० रोजी प्रख्यापित करण्यात आला आहे. सदर अध्यादेश महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिध्द केल्याची प्रत आपल्या माहितीसाठी व आवश्यक कार्यवाहीसाठी सोबत पाठविण्यात येत आहे.

आपला,

( आ.श्रा.जिवने )
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत सादर अग्रेषित(अध्यादेशाच्या इंग्रजी व मराठी प्रतीसह)
(१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
(२) मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव,
(३) प्रधान सचिव (नगर विकास विभाग),मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
(४) सचिव (नगर विकास विभाग), मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
(५) नगर विकास विभागातील सहसचिव/ उपसचिव/ अवर सचिव/ कक्ष अधिकारी,
(६) वेब कोऑर्डिनेटर(नवि-२९),नगर विकास विभाग,मंत्रालय,मुंबई-३२,
(७) निवडनस्ती (नवि-३२).

H 2298-1 ड
Draft 635D:\backup\d\Desk 32